**महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परिक्षा २०१३**
**मधील सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य)**
**गट-ब या पदावरील नियुक्तीबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## जलसंपदा विभाग
**शासन निर्णय क्रमांकः नियुक्ती २०१४/२३०/(प्र.क्र.४५/२०१४)/भाग-५/आ(सअश्रे-२)**

गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकुल,
४ था मजला,जलसंपदा विभाग, नविन मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
तारीख: २१ फेब्रुवारी, २०१५

## शासन निर्णय

महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा परिक्षा २०१३ सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) गट-ब या पदावरील नियुक्तीसाठी सरळसेवा भरतीद्वारे घेण्यात आलेल्या एकत्रित स्पर्धात्मक परिक्षेच्या निकालावर आधारित महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई याच्या दिनांक २९ मार्च, २०१४ च्या पत्रान्वये, सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) पदावर नियुक्तीसाठी शिफारसप्राप्त ७४८ उमेदवारांपैकी सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मधील सद्यस्थितीत नियुक्तीस पात्र ठरलेल्या उमेदवारांची जलसंपदा विभागात ते रुजू होतील त्या दिनांकापासून त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या प्रवर्गामध्ये दोन वर्षांच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) म्हणून रुपये ९३००-३४८०० + ग्रेड पे रु. ४४०० या वेतनश्रेणीत त्यांच्या नावासमोरील स्तंभ ७ मध्ये नमूद केलेल्या विभागात/कार्यालयात नियुक्ती करण्यात येत आहे. उर्वरित उमेदवारांच्या चारित्र्य पडताळणी, वैद्यकीय पात्रतेचा अहवाल तसेच, खेळाडू प्रवर्गातून निवड झालेल्या उमेदवारांची आवश्यक ती प्रमाणपत्र पडताळणी प्राप्त झाल्यानंतर त्यांच्या नियुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात येतील.

२. परिशिष्ट-अ मधील उमेदवारांना महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित ) पदावर सरळसेवेने नियुक्तीसाठी विभागीय संवर्ग संरचना व विभागीय संवर्ग वाटप नियमावली २०१० लागू राहील. सदर उमेदवारांची महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-२(स्थापत्य), जलसंपदा विभागातील पदस्थापना ही अंतिम असून त्यात बदल होणार नाही.

३. सदर उमेदवारांची ज्येष्ठता शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही १०७६/१२, दि.२१.६.१९८२ अन्वये विनियमित केलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन ) नियम, १९८२ मधील तरतुदीनुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या गुणवत्ता क्रमांकानुसार निश्चित करण्यात येईल.

४. महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-२ गट-ब मधील उमेदवारांची नियुक्ती ही दोन वर्षाचा परिविक्षाकाळ समाधानकारकरित्या पूर्ण करण्याच्या व खालील विहित शर्तीच्या अधीन असेल.

अ) परिशिष्ट-अ मधील उमेदवारांनी खाली नमूद अटी व शर्तीच्या अधीन महाराष्ट्र शासनाच्या सेवेत सविस्तर नियुक्ती मिळण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक/मुख्य अभियंता/ यांच्याकडे हे आदेश निर्गमित झाल्याच्या तारखेपासून एक महिन्याच्या आत प्रत्यक्ष संपर्क साधावा व सेवेत रुजू व्हावे.

ब) उमेदवारांने नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्यांच्या आत त्यांच्या नेमणूकीच्या ठिकाणी रुजू झाले पाहिजे. अन्यथा एक महिन्यानंतर सदर नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील. कार्यालय प्रमुखांनी एक महिन्यानंतर रुजू होणा-या अभियंत्यास रुजू करुन घेवू नये.

क) विहित कालावधीत अपरिहार्य, उचित कारणास्तव त्यांना रुजू होण्यासाठी मुदतवाढ हवी असल्यास उमेदवारांनी सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १० दिवसांच्या आत सचिव(लाक्षेवि),जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई यांना मुदतवाढीसाठी अर्ज सादर करावा. तद्नंतर प्राप्त झालेले अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत. नियुक्तीच्या आदेशानुसार एक महिन्याच्या आत सेवेत रुजू न होणाऱ्या उमेदवारांना सेवा ज्येष्ठता गमवावी लागेल ; त्यांची ज्येष्ठता ते ज्या दिनांकास शासन सेवेत रुजू होतील, त्या दिनांकास निश्चित करण्यात येईल. उचित कारणास्तव विहीत कालावधीत मुदतवाढीसाठी अर्ज करणा-या उमेदवारांना मुदतवाढ देण्याचा निर्णय शासनाचा राहिल. विहित मुदतीत शासन सेवेत रुजू न होणाऱ्या उमेदवारांच्या नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील.

ड) संबंधित मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता यांना असे कळविण्यात येते की, परिशिष्ट-अ मधील उमेदवारांच्या नियुक्तीचे कार्यालय/पदस्थापना दर्शविलेल्या ठिकाणी पदस्थापनेचे सविस्तर आदेश या आदेशाच्या दिनांकापासून ३ दिवसांत काढावेत व त्याबाबतचा अहवाल शासनास तात्काळ पाठविण्यात यावा. शासन आदेशात नमूद केल्यानुसार सामान्य प्रशासन विभागाने विभागीय संवर्ग वाटपाद्वारे मंजूर केलेल्या महसूली विभागात कोणताही बदल करण्यात येवू नये अन्यथा संबंधितांविरुध्द शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्यात येईल. तसेच, सदर आदेशान्वये नियुक्ती दिलेल्या उमेदवारांना रुजू करुन घेण्यापूर्वी त्यांची सर्व संबंधित मुळ कागदपत्रे तपासून रुजू करुन घ्यावे.

५. परिशिष्ट-अ मधील मागास प्रवर्गाच्या राखीव पदावर नियुक्त केलेल्या उमेदवारांनी जातीचा दावा संबधित विभागीय जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र शासनास व संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यास सादर करणे आवश्यक राहिल. परिशिष्ट अ मधील ज्या उमेदवारांनी जातवैधता प्रमाणपत्र शासनास सादर केलेली नाही. अशा उमेदवारांना सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.बीसीसी २०११/प्र.क्र १०६४/२०११/१६ ब दि. १२.१२.२०११ मधील तरतुदीच्या अनुषंगाने नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीच्या अधीन राहून तात्पूरती नियुक्ती देण्यात येत आहे. संबंधित उमेदवारांनी नियुक्ती आदेश प्राप्त झाल्याच्या

दिनांकापासून ६ महिन्याच्या आत जातवैधता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. अन्यथा नियुक्ती आदेश रद्द करण्यात येतील.

६. खुल्या प्रवर्गातील महिलांसाठी आरक्षित जागेवर शिफारस झालेल्या महिला उमेदवारांना महिला आरक्षणाचा लाभ देण्यासाठी त्यांनी सादर केलेली नॉन क्रिमिलेअर प्रमाणपत्रे महिला व बालविकास आयुक्तालय, पुणे यांच्या कडून तपासणीअंती वैध ठरण्याच्या अटीच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे.

७. आवश्यकता भासल्यास परिशिष्ट-अ मधील उमेदवारांना भारताच्या संरक्षण सेवेतील पदावर किंवा भारताच्या संरक्षणाशी निगडीत असलेल्या कुठल्याही पदावर देशात किंवा परदेशात प्रशिक्षणाचा कालावधी धरुन चार वर्षापेक्षा कमी नसणाऱ्या कालावधीसाठी भारत सरकार ठरविल त्या शर्तीवर सेवा करावी लागेल. परंतु

(अ) त्यांच्या नियुक्तीनंतर १० वर्षांचा कालावधी संपल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही किंवा

(ब) सर्वसाधारणपणे त्यांच्या वयाची ४० वर्षे पूर्ण झाल्यानंतर त्यांना अशी सेवा करावी लागणार नाही.

८. परिशिष्ट-अ मधील उमेदवारांनी हिन्दी व मराठी भाषा परीक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल किंवा तिला भाषा परिक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर यासंबंधी असलेल्या नियमानुसार भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक आहे.

९. परिशिष्ट-अ मधील उमेदवारांनी शासनाने विहित केलेली संगणक परिक्षा अगोदरच उत्तीर्ण केली नसेल तर शासनाने विहित केलेली संगणक परीक्षा या संबंधी असलेल्या नियमानुसार उत्तीर्ण करावी लागेल.

१०. परिशिष्ट-अ मधील उमेदवारांची सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असल्यास, त्यांना शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०९२/१०३३/ प्र.क्र.३३/ ९२/८, दिनाक २/१२/९७ मधील तरतूदीनुसार शासनाला किमान १ (एक) महिन्याची आगाऊ नोटीस किंवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक राहील. मात्र, गैरशिस्त, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी वरीलप्रमाणे नोटीस देण्याचे बंधन शासनावर राहणार नाही.

११. परिशिष्ट-अ मधील उमेदवारांनी महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणासंबंधी, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक:टीआरएन-०९/ प्र.क्र.३९/०९/१२-अ, दि.२३ सप्टेंबर,२०११ मधील परिच्छेद सहा येथील तरतुदीनुसार प्रशिक्षण सुरु होण्यापूर्वी प्रशिक्षणार्थीने सक्षम प्राधिकाऱ्यास बंधपत्र लिहून द्यावे लागेल. त्याप्रमाणे जर एखादा प्रशिक्षणार्थी त्यांच्या परिवीक्षाधीन कालावधीत नोकरी सोडत

असेल तर प्रशिक्षणावर खर्च झालेली रक्कम प्रशिक्षणार्थीकडून वसूल करून संबंधित प्राधिकाऱ्याला प्रथम शासनाकडे जमा करावी लागेल. याबाबतचे दर शासन निश्चित करेल.

त्यानुसार प्रत्येक प्रशिक्षणार्थीला मेटा, नाशिक येथे रूजू होण्यापूर्वी मुख्य अभियंता महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांच्याकडे व संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडे सोबत जोडलेले बंधपत्र भरून सादर करणे बंधनकारक राहील.

१२. संबंधित मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता किंवा कार्यालय प्रमुख यांनी सेवेत दाखल होणाऱ्या उमेदवारांचे ते हजर झाल्याचा दिनांकाचा अहवाल शासनाला व मुख्य अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांना तात्काळ सादर करावा.

१३. परिशिष्ट-अ मधील उमेदवार ३० दिवसांच्या मुदतीत/विहित कालाधीत हजर/रुजू न झाल्याबाबतचा अहवाल संबंधित मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता किंवा कार्यालय प्रमुख यांनी शासनाला व मुख्य अभियंता महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांच्याकडे पुढील कार्यवाहीसाठी सादर करावा.

१४. संबंधित अधिकाऱ्यांनी उमेदवार रुजू झाल्यानंतर त्यांची वैयक्तिक माहिती आवश्यक त्या प्रमाणपत्राच्या प्रतीसह (२ प्रती) शासन ज्ञापन, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक सीआरएफ १२६५/डी-१/२९/११/६५ अनुसार शासनास पाठवावी. तसेच फॉर्म क्रमांक पार्ट एफजीईएन २५४/(सी)(आऊटर कव्हर) मध्येही दोन प्रतीत माहिती शासनास पाठवावी.

१५. परिशिष्ट-अ मधील उमेदवार ज्या दिवशी रुजू होतील त्या दिवसापासून नियमाप्रमाणे त्यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यात यावेत व बदली झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्याकडे पाठवून विभाग प्रमुखांनी याबाबत संबंधित मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता व शासनास कळवावे.

१६. संबंधित अधीक्षक अभियंतांनी परिशिष्ट-अ मधील उमेदवारांचा परिविक्षाधीन कालावधी संपण्याच्या एक महिना अगोदर त्यांचे परिविक्षाधीन काळातील विशेष मुल्यनिर्धारण अहवाल शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०६२/डी, दिनांक २६/४/६२ मध्ये विहित केलेल्या नमुन्यात तीन प्रतीमध्ये शासनास पाठवावेत.

१७. परिशिष्ट-अ मधील उमेदवार जर सध्या जलसंपदा विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग अथवा शासनाच्या इतर विभागात काम करीत असतील तर संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांना नेमणूकीचे ठिकाणी हजर होण्याच्या दृष्टीने सदर सेवेतून कार्यमुक्त झाल्याचे अथवा तसे लेखी पत्र संबंधित मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता किंवा कार्यालय प्रमुख यांना सादर केल्याशिवाय त्यांना रुजू करुन घेता येणार नाही.

१८. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अंनियो १००५/१२६/सेवा-४, दि.३१/१०/२००५ अन्वये उमेदवाराना नविन परिभाषीत अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल, भविष्य निर्वाह निधी योजना त्यांना लागू होणार नाही. मात्र उपरोक्त उमेदवारांपैकी जे शासकीय कर्मचारी १ नोव्हेंबर २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनाई आस्थापनेवर कार्यरत असतील त्यांना शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंनियो १००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी २००७ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून महाराष्ट्र नागरीसेवा (निवृत्ती वेतन) नियम १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास पाठवावा.

१९. वरीलपैकी जे उमेदवार सेवेत हजर होतील त्यांचे बाबतचा एकत्रित अहवाल तसेच जे हजर होणार नाहीत त्यांचा गोषवारा व परिच्छेद १४ येथे नमूद केल्याप्रमाणे प्रशिक्षणार्थीकडून घेतलेले बंधपत्र एकत्रितरीत्या मुख्य अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधीनी, नाशिक यांनी तात्काळ शासनास सादर करावे.

२०. तसेच प्रशिक्षणा दरम्यान सर्व प्रशिक्षणार्थीकडून प्रबोधिनीच्या प्रशिक्षणबाबतच्या नियमांचे व शिस्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. त्यांच्याकडून नियमभंग झाल्यास प्रबोधिनीकडून त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल.

२१. परिशिष्ट-अ मधील उमेदवारांनी विहित विभागीय परीक्षा परिविक्षाधीन कालावधीमध्ये उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसेच परिविक्षाधीन कालावधीमध्ये विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास किंवा कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा त्यांचे काम योग्य अथवा अनुरुप न आढळल्यास त्यांच्या सेवा कोणतीही पूर्व सूचना न देता रद्द् करण्यात येतील.

२२. परिशिष्ट -अ मधील उमेदवारांनी नियुक्ती दिलेल्या कार्यालयात हजर झाल्यानंतर त्यांनी तात्काळ सोबतचे पत्र संबधित मुख्य अभियंता/अधिक्षक अभियंता यांच्या स्वाक्षरीसह या विभागाकडे पाठवावे. अन्यथा त्यांना दिलेली नियुक्ती त्यांनी स्विकारलेली नाही असे समजून योग्य ती कार्यवाही केली जाईल.

२३. विशिष्ट ठिकाणी पदस्थापना / बदली / नियुक्ती मिळविण्यासाठी खासदार/आमदार/ लोकप्रतिनिधी/ खाजगी व्यक्ती किंवा संघटना यांचे मार्फत दडपण/दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास संबधित उमेदवारांविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९ मधील तरतुदींनुसार शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२१११५२१९३२२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajshekhar Chandrakant Patil

Digitally signed by Rajshekhar Chandrakant Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajshekhar Chandrakant Patil
Date: 2015.02.21 17:02:42 +05'30'

**( रा.च.पाटील )**

उपसचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव (जलसंपदा),जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
२. सचिव(लाक्षेवि),जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
३. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१२, मंत्रालय,मुंबई.
४. महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल-१/२(लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर.
६. सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (पत्राने)
७. व्यवस्थापकीय संचालक, गोदावरी मराठवाडा नदी खोरे अभिकरण, औरंगाबाद.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृष्णा नदी खोरे अभिकरण, पुणे.
९. व्यवस्थापकीय संचालक, विदर्भ नदी खोरे अभिकरण, नागपूर.
१०.व्यवस्थापकीय संचालक, कोकण नदी खोरे अभिकरण, ठाणे.
११.व्यवस्थापकीय संचालक , तापी नदी खोरे अभिकरण, जळगांव.
१२.महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
१३.महासंचालक, जल व भूमि व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद.
१४. मुख्य अभियंता व संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.
१५. मा.मंत्री (जलसंपदा व लाक्षेवि) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
१६.मा.मंत्री (जलसंपदा/कृष्णा खोरे महामंडळ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१७.मा.राज्यमंत्री (जलसंपदा व लाक्षेवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१८.सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
१९.सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
२०.संबधित उमेदवार श्री/श्रीमती. ( यादीनुसार )
२१.आ(स.अ.श्रे.-२) कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : नियुक्ती २०१४/२३०/(४५/२०१४)/भाग-५, दि.२१/०२/२०१५ चे सहपत्र

## परिशिष्ट-अ

| अ.क्र. | गुणवत्ता क्र. | नाव | जात प्रवर्ग | नियुक्तीचा प्रवर्ग | सा.प्र.वि. ने वाटप केलेला संवर्ग | नियुक्तीसाठी पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | २०/२०१३ | आव्हाड संजय पांडुरंग | भ.ज.ड. | खुला | औरंगाबाद | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, ला.क्षे.वि.प्राधिकरण, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| २ | ७२/२०१३ | बोहरे हर्ष यशोराम | इ.मा.व. | खुला | नागपूर | मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत नागपूर प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ३ | ९४/२०१३ | गुळवे कालीदास लालासाहेब | खुला | खुला | पुणे | मुख्य अभियंता (विनिर्दीष्ट प्रकल्प), जलसंपदा विभाग, पुणे अंतर्गत पुणे प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ४ | ९५/२०१३ | श्रेयस मुरलीधर डहाके | भ.ज.क. | खुला | नागपूर | मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत नागपूर प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ५ | ११०/२०१३ | अरिकर सुधीर बाबुराव | खुला | खुला | पुणे | मुख्य अभियंता (विनिर्दीष्ट प्रकल्प), जलसंपदा विभाग, पुणे अंतर्गत पुणे प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ६ | १२५/२०१३ | हिंगमिरे अमेय रमेश | खुला | खुला | पुणे | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे अंतर्गत पुणे प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ७ | १३५/२०१३ | पाटील मयूर शिवकुमार | खुला | खुला | पुणे | मुख्य अभियंता (विनिर्दीष्ट प्रकल्प), जलसंपदा विभाग, पुणे अंतर्गत पुणे प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ८ | १४२/२०१३ | कुरुंदवाडे स्वप्नील सुधाकर | खुला | खुला | पुणे | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे अंतर्गत पुणे प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ९ | १४४/२०१३ | शेख मंसूर अहमद मोहम्मद शकील अहमद | खुला | खुला | औरंगाबाद | मुख्य अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण) विभाग, पुणे अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| १० | १६१/२०१३ | पांडे गौरी जयंतराव | खुला | खुला | औरंगाबाद | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, ला.क्षे.वि.प्राधिकरण, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ११ | २०३/२०१३ | शास्त्री धनंजय अनंतराव | खुला | खुला | औरंगाबाद | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| १२ | २१३/२०१३ | महाजन रुतूजा मोहन | खुला | खुला | कोकण | मुख्य अभियंता, कोंकण प्रदेश, मुंबई अंतर्गत कोकण प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| १३ | २२२/२०१३ | मो सरफराज सत्तार शेख | खुला | खुला | नागपूर | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत नागपूर प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| १४ | २४९/२०१३ | देशमुख ऋषीकेश प्रल्हादराव | खुला | खुला | औरंगाबाद | मुख्य अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण) विभाग, पुणे अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |

| अ.क्र. | गुणवत्ता क्र. | नाव | जात प्रवर्ग | नियुक्तीचा प्रवर्ग | सा.प्र.वि. ने वाटप केलेला संवर्ग | नियुक्तीसाठी पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १५ | २८८/२०१३ | गोल्डे अभिनव श्रीकिसन | खुला | खुला | औरंगाबाद | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, ला.क्षे.वि.प्राधिकरण, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| १६ | २९९/२०१३ | काळे दिपक सूर्यभान | खुला | खुला (खेळाडू ऐवजी) | औरंगाबाद | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| १७ | ३०९/२०१३ | सोनकुसरे मयुर रामदास | वि.मा.प्र. | वि.मा.प्र. | नागपूर | मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत नागपूर प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| १८ | ३३०/२०१३ | सातदिवे हर्षराज गौतमराव | अ.जा. | अ.जा. | औरंगाबाद | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| १९ | ३५१/२०१३ | गजभिये विकास सिताराम | अ.जा. | अ.जा. | नागपूर | मुख्य अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण) विभाग, पुणे अंतर्गत नागपूर प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| २० | ३९७/२०१३ | गिरी हेमंत मुरलीधर | भ.ज.ब. | भ.ज.ब. | नाशिक | मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव अंतर्गत नाशिक प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| २१ | ४१३/२०१३ | सुर्यवंशी रविंद्र विलास | अ.जा. | अ.जा. | औरंगाबाद | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| २२ | ४२३/२०१३ | होवाळे सन्नी अशोक | अ.जा. | अ.जा. | औरंगाबाद | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, ला.क्षे.वि.प्राधिकरण, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| २३ | ४३१/२०१३ | बनसोडे आशिष परमेश्वर | अ.जा. | अ.जा. | औरंगाबाद | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, ला.क्षे.वि.प्राधिकरण, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| २४ | ४५७/२०१३ | मेश्राम सुमित मोरेश्वर | अ.जा. | अ.जा. | नागपूर | मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत नागपूर प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| २५ | ४६६/२०१३ | दगडे मयुर सुदर्शन | अ.जा. | अ.जा. | अमरावती | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग (विशेष प्रकल्प), अमरावती अंतर्गत अमरावती प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| २६ | ४८८/२०१३ | व्हनमाने अभिमन्यू शिवाजी | भ.ज.क. | भ.ज.क. | अमरावती | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग (विशेष प्रकल्प), अमरावती अंतर्गत अमरावती प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| २७ | ५३९/२०१३ | रामेकर मंजिरी अशोकराव | अ.जा. (महिला) | खुला (महिला) | नागपूर | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत नागपूर प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| २८ | ५५६/२०१३ | आहेर रुही रविंद्र | इ.मा.व. (महिला) | खुला (महिला) | नाशिक | मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक अंतर्गत नाशिक प्रादेशिक विभागात रिक्त पदी |

| अ.क्र. | गुणवत्ता क्र. | नाव | जात प्रवर्ग | नियुक्तीचा प्रवर्ग | सा.प्र.वि. ने वाटप केलेला संवर्ग | नियुक्तीसाठी पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| २९ | ५५८/२०१३ | खंडारे श्रध्दा सुदाम | अ.जा. (महिला) | खुला (महिला) | अमरावती | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती अंतर्गत अमरावती प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ३० | ५६३/२०१३ | समर्थ देवयानी दिलीप | इ.मा.व. (महिला) | खुला (महिला) | नागपूर | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत नागपूर प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ३१ | ५७५/२०१३ | फेगडे श्वेता विकास | इ.मा.व. (महिला) | खुला (महिला) | औरंगाबाद | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ३२ | ५८९/२०१३ | मिनल गोकुळदास लाड | अ.जा. (महिला) | खुला (महिला) | औरंगाबाद | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, ला.क्षे.वि.प्राधिकरण, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ३३ | ५९६/२०१३ | सातपुते अंजली लक्ष्मण | अ.जा. (महिला) | खुला (महिला) | कोकण | मुख्य अभियंता, कोंकण प्रदेश, मुंबई अंतर्गत कोकण प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ३४ | ६०७/२०१३ | तुमराम हर्षाली सुधाकर | अ.ज. (महिला) | खुला (महिला) | नागपूर | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर अंतर्गत नागपूर प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ३५ | ६१३/२०१३ | शेळके वर्षा माणीकराव | अ.जा. (महिला) | खुला (महिला) | नागपूर | मुख्य अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण) विभाग, पुणे अंतर्गत नागपूर प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ३६ | ६५७/२०१३ | धनविज प्राची बाबा | अ.जा. (महिला) | अ.जा. (महिला) | कोकण | मुख्य अभियंता, कोंकण प्रदेश, मुंबई अंतर्गत कोकण प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ३७ | ६६०/२०१३ | शिराळे राजेश लालसिंग | अ.जा. (अपंग) | अ.जा. (अपंग) | औरंगाबाद | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ३८ | ६९३/२०१३ | भोई रेखा मधुकर | भ.ज.ब. (महिला) | भ.ज.ब. (महिला) | औरंगाबाद | मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, ला.क्षे.वि.प्राधिकरण, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ३९ | ६९६/२०१३ | धिंदाळे कुणाल काशिनाथ | अ.ज. | अ.ज. (महिला ऐवजी) | औरंगाबाद | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |
| ४० | ७०३/२०१३ | खान हाफीज उल्ला | खुला (अपंग) | खुला (अपंग) | औरंगाबाद | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद अंतर्गत औरंगाबाद प्रादेशिक विभागात रिक्त पदी |

Rajshekhar Chandrakant Patil

Digitally signed by Rajshekhar Chandrakant Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajshekhar Chandrakant Patil
Date: 2015.02.21 17:03:06 +05'30'

(रा.च.पाटील)

उपसचिव,महाराष्ट्र शासन